विषय : खाजगी उद्योजकांमार्फत मुंबई शहर व मुंबई उपनगरे जिल्हयाचे परिसरात "बांधा,मालकी,वापरा,परत करा" ह्या तत्वावर बारमाही जलप्रवासी वाहतूक सुरु करण्यासाठी जलप्रवासी वाहतूक धोरण.

# महाराष्ट्र शासन.
## गृह विभाग.

शासन निर्णय क्रमांक : आयडब्ल्युटी २०९८/सीआर -३१/पीआरटी १.
गृह विभाग,मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १४ जून १९९९.

संदर्भ : १) शासन निर्णय क्रमांक : आयडब्ल्युटी -२०९८/सीआर-३१/परि. ४, दिनांक १४ जुलै, १९९८.

२) शासन निर्णय क्रमांक : आयडब्ल्युटी - २०९८/सीआर-३१/पीआरटी-१, दिनांक १८ फेब्रुवारी १९९९.

**प्रस्तावना :-**

मुंबई शहर व मुंबई उपनगरे जिल्हाचे परिसरात " बांधा,मालकी,वापरा,परत करा" या तत्वावर खाजगी क्षेत्राच्या सहभागाने जलवाहतूक सुरु करण्याच्या शासनाच्या धोरणाने अनुषंगाने इतर बाबींबरोबरच खालील मुद्यांवरील शासनाच्या धोरणांचा प्रस्ताव विचाराधीन होता :-

अ) मुंबई व उपनगरात जलवाहतुक सुरु करण्यासाठी उपलब्ध करुन दयावयाची जागा व त्याची भाडेपट्टी ठरविणे.

ब) हा प्रकल्प यशस्वी करण्यासाठी भाडेपट्टीवर दयावयाचे जमिनीचा वाणिज्यिक विकास करण्याची परवानगी खाजगी उद्योजकांना देण्याबाबत शासनाचे धोरण.

क) जकात,विक्री कर इत्यादी बाबींकरीता सवलती / सुट देण्याबाबतचे धोरण.

ड) जलवाहतूक केंद्रासाठी पायाभूत सुविधा म्हणजे जेट्टी, वाहनतळ,प्रवाशांच्या सुखसोयीसाठी प्रतिक्षाकक्ष, स्वच्छता कक्ष,नियंत्रणकक्ष, इंधन डेपो इत्यादींची निर्मिती व त्यासाठी

C:\Prakash\IWT GR (4/1/99)

लागणारी शासकीय जमिन उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाचे धोरण.

इ) वीज, पाणी,सांडपाणी तसेच पोच मार्ग इत्यादी जलवाहतुकीसाठी आवश्यक असणा-या सुविधा उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाचे धोरण.

फ) प्रकल्पासाठी सवलतीचा कालावधी.

**शासन निर्णय :-**

२. उपरोक्त मुद्दयांवरील शासकीय धोरणाचा विचार पूर्ण झाला असून शासनाने जलवाहतूकीसाठी दयावयाची जागा व जागेची भाडेपट्टी, जलवाहतूक केंद्रासाठी व जलवाहतूकीसाठी आवश्यक असणा-या सुविधा व इतर अनुषंगिक बाबींवर घेतलेले निर्णय सोबतच्या सहपत्रात नमूद केलेले आहेत.

हे आदेश महसूल विभाग,नगरविकास विभाग व वित्त विभाग यांचे सहमतीने काढलेले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही /-

( श.वा.मोपकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन ,गृह विभाग.

गृह विभाग, क्रमांक : आयडब्ल्युटी २०९८/सीआर-३१/पीआरटी - १.
दिनांक : १४ जून १९९९ च्या शासन निर्णयाचे.

# स ह प त्र

१) जलवाहतूक सुरु करण्याच्या दृष्टीने पायाभूत सुविधा उदा. जेट्टी, प्रवासी सुविधा व इतर पूरक सोयी यांची निर्मिती करण्यासाठी आवश्यक असलेली शासकीय जमीन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला महसूल विभागाकडून प्रतिवर्षाकरीता रु. १/- या नाममात्र दराने ९९ वर्षाच्या कालावधीकरिता भाडेपट्ट्यावर देण्यात येईल.

२) ही जमीन महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड जलप्रवासी वाहतूक करणा-या उद्योजकांना परिस्थितीनुसार आवश्यक त्या अटी व शर्तीवर उपलब्ध करुन देईल. फक्त जेट्टी करिता लागणारी जमीन विनामुल्य देण्यात येईल.

३) अशा पध्दतीने उपलब्ध करुन देण्यात आलेली जमीन उद्योजकाला पायाभूत सुविधांची निर्मिती करण्यासाठी लागणारा निधी उभारण्याकरीता गहाण ठेवण्याची परवानगी राहील व ही परवानगी देण्याबाबतचे अधिकारी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डास राहतील.

४) उद्योजकांकडून जलवाहतूकीकरिता प्राप्त झालेल्या निविदांचे मूल्यमापन करताना उद्योजक शासकीय जमीनीचे भाडे किती देणार आहे आणि शासकीय व जमीनीच्या सवलतींची किती कालावधीकरिता मागणी करीत आहे हे निकष राहतील.

५) प्रवासी सुखसोयीकरिता आवश्यक बाबी उदा. उपहारगृहे, प्रतिक्षालये,पुस्तकांचा स्टॉल, दूरध्वनी केंद्र, वाहतूक नियंत्रण कक्ष, वाहनतळ, सुरक्षा कक्ष इत्यादीसाठी किती जमीनीचा वापर करता येईल याबाबतचे धोरण महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने नगरविकास विभागाचा सल्ला घेऊन ठरवावे. अशारितीने अनुज्ञेय होणारी जमीन उद्योजकाला भाडेपट्टीवर देण्यामुळे महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला मिळणारे उत्पन्न पूर्णपणे बोर्डाच्या निधीत शासकीय अनुदान म्हणून जमा राहील. अनुज्ञेय ठरलेल्या वापरापेक्षा जास्त जमीनीचा वापर उद्योजकांकडून होणार नाही याबद्दल महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने योग्य ती दक्षता घ्यावी.

६) यशस्वी निविदाकार उद्योजकाला भाडेपट्टीवर देण्यात आलेल्या जमीनींचा उपयोग हा परवानगी दिलेल्या कारणासाठीच उदा. उपहारगृहे, प्रतिक्षालये,पुस्तकांचा स्टॉल, दूरध्वनी केंद्र,वाहतूक नियंत्रण कक्ष, वाहनतळ सुरक्षा कक्ष, अग्निशमन व्यवस्था आणि

इंधन डेपो इत्यादीकरीताच करता येईल व त्यासाठी ही जागा विकसित करतांना पर्यावरण विभागाची संमती अशा उद्योजकाला घ्यावी लागेल.

७) जलवाहतूकीचे संदर्भात जलयाने उतरविण्याच्या जागांचा (लॅन्डींग पॉइन्टस्) अभ्यास करण्यासाठी नेमलेल्या समितीने जलयाने उतरविण्याच्या जागा (लॅन्डींग पॉईन्टस्) व जलवाहतूकीसाठी जेट्टीकरिता योग्य जागा आणि अशा जागांचे सर्व्हे नंबर निश्चित केले आहेत. या समितीच्या अहवालाला व शिफारशींना शासन निर्णय,क्रमांक : एसएएन १०९५/सीआर-१८/परि.४ , दिनांक १७ मे १९९७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. तथापि, काही तांत्रिक कारणांमुळे अशा जागांमध्ये बदल करावा लागला तर जमीनी वर्ग करण्याबाबतचा शासनाने घेतलेला धोरणात्मक निर्णय अशा जागांना देखिल आपोआप लागू होईल व त्यासाठी नव्याने मंजूरी घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

८) जलवाहतूकीसाठी निवडलेल्या जागांचा समावेश विकास आराखडयामध्ये जलवाहतुकीसाठी आरक्षित म्हणून ठेवण्याची कार्यवाही नगरविकास विभागाने करावी.

९) जलवाहतुक प्रकल्पासाठी आवश्यक असणा-या पायाभुत सुविधा उदा. पोचमार्ग, पाणी पुरवठा ,वीज,सांडपाणी व्यवस्था आणि वाहनतळ इ. संबंधित स्थानिक संस्था जसे मुंबई /ठाणे/नवी मुंबई महानगरपालिका किंवा विकास प्राधिकरण जसे सिडको,मुंबई महानगर प्रादेशिक विकास प्राधिकरण यांनी उपलब्ध करुन द्याव्यात व त्यासाठी आवश्यक ती तरतूद विनिर्दीष्टपणे त्यांच्या अर्थसंकल्पात करावी. अशा सुविधा वेळेच्या आत पूर्ण करुन देण्याबाबत अशा संस्था /प्राधिकरणे यांनी निश्चित हमी द्यावी. तथापि, त्यांना यासाठी राज्यशासनाकडून नियतव्यय उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

१०) जलवाहतूक सुरु करण्यापूर्वी संबंधित उद्योजकास अनेक विभागाकडून परवाने प्राप्त करावे लागणार आहेत. असे परवाने उद्योजकाला मिळवून देण्यासाठी संपर्क यंत्रणा म्हणून महाराष्ट्र मेरी टाईम बोर्ड कार्य करेल.

११) जलवाहतुकीसाठी आवश्यक असे विविध जलमार्ग महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून निश्चित केले जातील आणि त्या मार्गाकरीता निविदा मागविण्यात येतील. तथापि, जास्तीचे नवीन मार्ग उद्योजकाला सुचविता येतील आणि पूर्व अर्हता देकारामध्ये ( Pre-qualification Bid ) महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड त्याबाबत विचार करु शकेल.

१२) नौकानयनाने मार्ग महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाकडून अधिसूचित करण्यात येतील.

१३) जेट्टीसाठी आणि प्रवासी सुखसोईसाठी आराखडे हे संबंधित उद्योजकांकडून महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाला सादर केले जातील व त्यास महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाची मान्यता मिळाल्यानंतर संबंधित नियोजन प्राधिकरणाकडून त्यास मान्यता मिळविण्याची

जबाबदारी अशा उद्योजकांची राहिल. अशी जेट्टी बांधताना ती भविष्यामध्ये मालवाहतूकीसाठी वापरता येईल अशा दृश्टीने अशा जेट्टींचा आराखडा राहिल.

१४) जलमार्गासाठी महाराष्ट्र मेरीटाईम बोर्डाने अधिसुचित केलेल्या नौकानयन मार्गातील गाळ काढण्याचा भांडवली व आवर्ती खर्च हा सवलतीच्या संपूर्ण कालावधीमध्ये उद्योजक करेल.

१५) यशस्वी उद्योजकाने अशारितीने बांधलेल्या जेट्टीच्या आकार हा त्या उद्योजकांकडून निश्चित केला जाईल तसेच अशा जेट्टीचा वापर करण्यास इच्छुक असणा-या इतरांकडून जेट्टीच्या वापरासाठी काय आकार घ्यावा हे ठरविण्याचे अधिकारही अशी जेट्टी बांधलेल्या उद्योजकालाच राहतील. सवलतीच्या कालावधीत अशा त-हेची सुविधा निर्माण करण्यासाठी इतर स्पर्धकांना परवानगी दिली जाणार नाही याची हमी शासन देईल.

तथापी यशस्वी उद्योजकांनी बांधलेल्या जेट्टीचा वापर मालवाहतुकीसाठी सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमे व राज्य शासनाला करता येईल व त्याबाबत उद्योजक सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांकडून योग्य तो आकार घेऊ शकेल. परंतु राज्य शासनाला मात्र याबाबत कोणतेही भाडे अशा उद्योजकाला आकारता येणार नाही.

१६) सवलतीच्या कालावधीत पायाभूत सुविधा विकसित करणा-या व जलवाहतूक करण्या-या उद्योजकाला जलप्रवासी वाहतूकीसाठी देण्यात आलेल्या मार्गावर त्या उद्योजकांना जलप्रवासी वाहतूकीसाठी एकाधिकार राहिल. जलप्रवासी वाहतुकीसाठी आकारावयाच्या भाडयाबाबत वाद निर्माण झाल्यास ती बाब लवादासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड यांचेकडे सोपविण्यात येईल व त्यांचा निर्णय अंतिम व संबंधितांवर बंधनकारक राहिल.

१७) खाजगीकरणातून " बांधा,मालकी,वापरा व हस्तांतरीत करा " (BOOT) या तत्वावर करण्यात येणा-या जलवाहतूकीच्या प्रकल्पाना सवलतीच्या कालावधी तीस वर्षे राहील व हा कालावधी बंदर विकासाच्या शासनाच्या धोरणानुसार वाढविता येईल. सवलतींच्या कालावधीबाबतचा देकार तीस वर्षापेक्षा कमी अवधी करीता उद्योजक देऊ शकेल आणि उद्योजकांची निवड करताना असा कालावधी एक निकष राहिल.

१८) यशस्वी निविदाकार उद्योजकांने जल प्रवासी वाहतूक ही करार केल्या पासून दोन वर्षाच्या आत सुरु करावी. अन्यथा करारान्वये दिलेल्या सर्व सुविधा आपोआप ताबडतोब रद्द होतील व निविदाकार उद्योजकांचे सर्व अधिकार आपोआप ताबडतोब नष्ट होतील.

-------------------------